**शासकीय महाविद्यालये / संस्था यामधील सहाय्यक प्राध्यापक यांची सेवांतर्गत प्रगती योजना (Career Advancement Scheme) अंतर्गत वरिष्ठ श्रेणी व निवड श्रेणी मध्ये स्थाननिश्चिती करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण- २०२२/प्र.क्र.७१/मशि १**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनाक : २६ जुन, २०२३

वाचा :-
१. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एनजीसी १२८६/(१२२४) विशि-४, दि. २७.०२.१९८९.
२. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एनजीसी १२०२/ (१६६/२००२) विशि-४, दि. ०३.०४.२००३.
३. विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्र. एफ ३.१/२००९ दि. ३०.०६.२०१०
४. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण २०११ (२५/११)/विशि-१, दि. १५.०२.२०११.
५. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक : नियुक्ती-२०१६/(प्र.क्र.०७/१६)/ मशि-१, दिनांक २३.०३.२०१६.
६. विद्यापीठ अनुदान आयोगाचे पत्र क्र. एफ नं. १-७/२०१५ यु.II (१), दि. ०८.११.२०१७.
७. केंद्र शासन, मानव संसाधन विकास, मंत्रालय यांचे पत्र क्र. १-७/२०१५-यु.II, दि(१), दि. ०२.११.२०१७.
८. विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्र. एफ १-२/२०१७(EC/PS), दि. १८.०७.२०१८.
९. केंद्र शासन, मानव संसाधन विकास, मंत्रालय यांचे पत्र क्र. १-४/२०१७-यु.II, दि. २८.०१.२०१९.
१०. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५६/विशि-१, दि. ०८.०३.२०१९ व दि. १०.०५.२०१९.
११. संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे पत्र क्र. उशिसं-२०२१/कॅस/प्रशा-१/३९६, दि. १२.०१.२०२२.

**शासन निर्णय :-**

शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालये/संस्था / शासकीय अध्यापक महविद्यालये यामधील सहाय्यक प्राध्यापक/शारिरीक शिक्षण संचालक/ग्रंथपाल यांना विद्यापीठ अनुदान आयोगाने अधिसूचना क्र. एफ ३.१/२००९ दि. ३०.०६.२०१० अन्वये निकष विहित करून सेवांतर्गत प्रगती योजना (Career Advancement Scheme) लागू केली आहे. सदर अधिसुचनेतील तरतूदी राज्यात शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०११/(२५/११)/विशि-१, दि. १५.०२.२०११ अन्वये लागू करण्यात आल्या आहेत. केंद्र शासनाच्या मानव संसाधन विकास मंत्रालयाने संदर्भाधिन क्र. ७ येथील दि. ०२.११.२०१७ च्या पत्रान्वये विद्यापीठ तसेच महाविद्यालयातील शिक्षकीय पदांची वेतनश्रेणी ७ व्या वेतन आयोगानुसार सुधारित करणेबाबत सूचित केले आहे. विद्यापीठ अनुदान आयोगाने संदर्भाधिन क्रमांक ८ येथील दि. १८.०७.२०१८ च्या अधिसूचनेन्वये सेवांतर्गत प्रगती योजना (Career Advancement Scheme) लागू केली आहे. त्यानुसार राज्यातील शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय/ संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील अध्यापकांना ७ व्या वेतन आयोगातील तरतुदी संदर्भाधिन क्रमांक १० येथील दि.०८.०३.२०१९ व दि. १०.०५.२०१९ च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेल्या आहेत.

२. संदर्भाधिन क्रमांक ५ येथील शासन निर्णय दिनांक २३.०३.२०१६ अन्वये, डॉ. राजेश वारलुजी राऊत, सहाय्यक प्राध्यापक (वनस्पतीशास्त्र) व डॉ. मिली बेबी सहाय्यक प्राध्यापक (मानसशास्त्र) यांच्या हंगामी/कंत्राटी सेवा काही अटी-शर्ती व मा. उच्च न्यायालयात दाखल केलेली रिट याचिका क्रमांक ८७०८/२०१५ मधील मा. उच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून नियमित करण्यात आल्या आहेत. श्री. राजेश राऊत यांची सेवा नियमित करण्याचा दिनांक २७.०७.२००१ ते दि. १७.०६.२००३ या हंगामी सेवेमध्ये १० दिवस सेवाखंड असून, श्रीमती मिली बेबी यांची सेवा नियमित करण्याचा दिनांक ०३.०८.२००१ ते दि. १३.०८.२००६ या हंगामी सेवेमध्ये ३१० दिवस सेवाखंड आहे.

३. राज्यातील शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय/संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील सहाय्यक प्राध्यापक/शारिरीक शिक्षण संचालक/ग्रंथपाल यांना वरिष्ठ श्रेणी व निवड श्रेणीमध्ये स्थाननिश्चिती करण्यासाठी शासन निर्णय क्र. एससीपी -२०२१/ प्र.क्र.२१/मशि-१, दि. २३.०२.२०२१ अन्वये छाननी समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीच्या दि. ११.०१.२०२२ रोजीच्या बैठकीत समितीने केलेल्या शिफारसी विचारात घेवून, संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधिन क्रमांक ११ येथील दि. १२.०१.२०२२ च्या पत्रान्वये शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय/संस्था यामधील सहाय्यक प्राध्यापक/शारिरीक शिक्षण संचालक/ग्रंथपाल यांची वरिष्ठ श्रेणी (AGP ६००० ते AGP ७०००) व निवड श्रेणी (AGP ७००० ते AGP ८०००) मध्ये स्थाननिश्चिती करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

४. विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्र. एफ ३.१/२००९, दि. ३०/६/२०१० व अधिसूचना क्र. एफ १-२/२०१७/(इसी/पीएस), दि. १८.०७.२०१८ मधील सेवांतर्गत प्रगती योजनेतंर्गत (Career Advancement Scheme) वरिष्ठ श्रेणी व निवड श्रेणीमध्ये स्थाननिश्चितीच्या तरतुदींची पुर्तता करणाऱ्या खालील सहाय्यक प्राध्यापक यांची त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या दिनांकापासून वरिष्ठ श्रेणी व निवड श्रेणीमध्ये स्थाननिश्चिती करण्यास यान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच, त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेला हंगामी/कंत्राटी सेवेतील सेवाखंड क्षमापित करण्यास यान्वये शासन मान्यता देण्यात येत असून, क्षमापित केलेल्या सेवाखंडाचा कालावधी अर्हताकारी सेवा म्हणून हिशोबात घेतला जाणार नाही. सदर स्थान निश्चिती व सेवाखंड क्षमापित, शासन निर्णय क्रमांक : नियुक्ती-२०१६/(प्र.क्र.०७/१६)/मशि-१, दिनांक २३.०३.२०१६ मधील अटी व शर्तीच्या अधिन राहून, तसेच मा. उच्च न्यायालयात दाखल केलेली रिट याचिका क्रमांक ८७०८/२०१५ मधील मा. उच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे. ह्या निर्णयामुळे जर डॉ. राऊत व डॉ. मिली बेबी यांची स्थान निश्चिती नव्याने करावी लागली तर जादा दिलेल्या रक्कमेच्या वसुलीस ते पात्र असतील ह्याची जाणीव संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी संबंधितांना करुन द्यावी.

| अ. क्र. | सहाय्यक प्राध्यापक यांचे नाव | महाविद्यालयाचे नाव | शिफारस करण्यात आलेला दिनांक | | सेवाखंड क्षमापित |
|---|---|---|---|---|---|
| | | | वरिष्ठ श्रेणी (AGP ६००० ते AGP ७०००) | निवड श्रेणी (AGP ७००० ते AGP ८०००) | |
| १. | डॉ. राजेश वारलुजी राऊत (वनस्पतीशास्त्र) | शासकीय विज्ञान संस्था, मुंबई. | ०७.०८.२००७ | ३१.१२.२०१४ | १० दिवस |
| २. | डॉ. मिली बेबी (मानसशास्त्र) | वसंतराव नाईक कला व समाजविज्ञान संस्था, नागपूर. | ०९.०६.२००८ | १७.१०.२०१४ | ३१० दिवस |

२. उक्त सहाय्यक प्राध्यापक यांची वरिष्ठ श्रेणी व निवड श्रेणीमध्ये वेतन निश्चिती करण्याची कार्यवाही संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे करतील.

३. यासाठी येणारा खर्च, शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण- २०१८/ प्र.क्र.५६/ विशि-१, दि. ०८.०३.२०१९ मध्ये दर्शविलेल्या संबंधित अर्थसंकल्पीय लेखाशिर्षाखाली खर्ची दर्शविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२६१३२००३१९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HARIRAM VYANKATRAO PARHATE

Digitally signed by HARIRAM VYANKATRAO PARHATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=8bfd656b321bf6c348564562d46cd2934b62b770484625206559a2c204e56cb8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D01F16685AEDF1ABC9CFD58347280B4C4CB8D304AFD1D413884EF4D91AA1462D, cn=HARIRAM VYANKATRAO PARHATE
Date: 2023.06.26 13:21:04 +05'30'

**(ह. व्यं. पऱ्हाते)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
७. सर्व प्राचार्य/संचालक, शासकीय महाविद्यालये/संस्था.
८. डॉ. राजेश वारलुजी राऊत, सहाय्यक प्राध्यापक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई.
९. डॉ. मिली बेबी, सहाय्यक प्राध्यापक, वसंतराव नाईक कला व समाजविज्ञान संस्था, नागपूर.
१०. निवड नस्ती/मशि-१.